केंद्र शासनाचा लॉटरी [नियमन] अधिनियम १९९८ तरतुदींचा भंग करणा-या लॉटरी योजनांवर बंदी घालणेबाबत.

महाराष्ट्र शासन
वित्त विभाग
शासन निर्णय क्रमांक: मरालॉ-१०९९/प्र.क्र.६२/९९/लॉटरी-३,
नवीन प्रशासन भवन, ८ वा मजला,
मंत्रालयासमोर, मुंबई-४०० ०३२.
दिनांक:- ५ ऑगस्ट, १९९९.

वाचा: १] केंद्र शासन, लॉटरी [नियमन] अधिनियम, १९९८, दि. ७.७.९८
२] सर्वोच्च न्यायालय, न्याय निवाडा, दि. ७ मे, १९९९.

प्रस्तावना -

केंद्र शासनाचा लॉटरी [नियमन] अधिनियम १९९८, दिनांक ७ जुलै, १९९८ पासून पारित झालेला आहे. या अधिनियमास गोहाटी उच्च न्यायालयाने संविधानाच्या कलम १४, ३०१, ३०२ व ३०३ चा भंग करीत असल्याने, दिनांक १३ जुलै, १९९८ पासून अंतरिम स्थगिती दिली होती.

सर्वोच्च न्यायालयाने मेसर्स बी. आर. इंटरप्रायझेस विरुध्द उत्तर प्रदेश शासन व इतर प्रकरणी दिनांक ७ मे, १९९९ रोजी अंतिमरित्या न्यायनिवाडा करुन केंद्रशासनाचा लॉटरी [नियमन] अधिनियम १९९८, दिनांक ७.७.९८ वैध ठरविला असून केंद्रशासन व राज्य शासन यांना अधिनियमातील तरतुदींचे पालन करणे बंधनकारक केले आहे. या अधिनियमाचे पालन न करणा-या लॉटरी योजना बंद करण्याची बाब राज्य शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय

सर्वोच्च न्यायालयाने मेसर्स बी. आर. इंटरप्रायझेस विरुध्द उत्तर प्रदेश शासन व इतर प्रकरणी दिनांक ७ मे, १९९९ रोजी दिलेल्या अंतिम निर्णयाप्रमाणे लॉटरी [नियमन] अधिनियम १९९८ हा वैध असल्याचे घोषित केले आहे. वरील निर्णयामध्ये नमूद केल्यानुसार लॉटरी [नियमन] अधिनियम १९९८ मधील कलम ४ मधील तरतुदींचा भंग करणा-या ज्या लॉटरी योजना अस्तित्वात असतील त्या तात्काळ बंद करणे आवश्यक आहे.

त्यानुसार,

१] पूर्वघोषित निकाल असलेली म्हणजेच झटपट लॉटरी योजना [इंस्टंट लॉटरी]
२] एकांकी लॉटरी योजना [सिंगल डिझीट स्कीम]
३] अशी लॉटरी योजना जी केंद्र शासन अथवा कोणतेही राज्य शासन स्वत: चालवित नाही किंवा कोणत्याही खाजगी स्वरुपातील लॉटरी योजना.

[कृ.मा.प.]

उपरिनिर्दिष्ट सर्व लॉटरी योजनांच्या तिकिटांची महाराष्ट्र राज्यात विक्री, वितरण, आयोजन, व्यवस्थापन आणि प्रचलन इत्यादी प्रकारांना या आदेशान्वये बंदी घालण्यात येत आहे. हे आदेश त्वरित अंमलात येतील.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

[ अरविंद रा. भिरीकर ] ५।८
संचालक, अल्पबचत व राज्य लॉटरी आणि
पदसिध्द सहसचिव, वित्त विभाग.

प्रति,
महाराष्ट्र राज्य लॉटरी मंडळाचे अध्यक्ष/सदस्य [पत्राने]
सर्व राज्याचे मुख्य सचिव.
प्रधान सचिव, विधी व न्याय विभाग.
प्रधान सचिव, गृह विभाग.
अपर मुख्य सचिव, गृह विभाग [कायदा व सुव्यवस्था].
मुख्यमंत्र्यांचे सचिव.
प्रधान सचिव, वित्त विभाग.
पोलीस महासंचालक, मुंबई . पुढील योग्य त्या कार्यवाहीसाठी.
जिल्हाधिकारी [सर्व], माहितीसाठी व योग्य त्या कार्यवाहीसाठी.
सर्व पोलीस आयुक्त, माहितीसाठी व योग्य त्या कार्यवाहीसाठी.
सर्व पोलीस अधिक्षक, माहितीसाठी व योग्य त्या कार्यवाहीसाठी.
सर्व उपसंचालक, अल्पबचत / सर्व सहाय्यक संचालक, अल्पबचत यांना माहितीसाठी व पुढील योग्य त्या कार्यवाहीसाठी.
प्रधान सचिव [व्यय], वित्त विभाग, यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
प्रधान सचिव, लेखा व कोषागारे यांचे स्वीय सहाय्यक.
निवड नस्ती, लॉटरी-३.

---